**प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM JANMAN) या योजनेंतर्गत बहुउद्देशिय केंद्रांच्या अंमलबजावणीकरिता सन २०२४-२५ मध्ये प्राप्त निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांक आविवि-२०२३/प्र.क्र.१४४/का.१९
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.
दिनांक:-१० मार्च, २०२५

**वाचा:-**

१. जनजाती कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.१८०/२८/२०२२/PVTG/Pt/ दि.२ जानेवारी, २०२४.
२. जनजातीय कार्य मंत्रालय,भारत सरकार यांचे पत्र क्र. ११०१५ /२० /२०२३ - PVTG, दि.१२ जानेवारी, २०२४
३. जनजातीय कार्य मंत्रालय,भारत सरकार यांचे पत्र क्र. ११०१५ /२० /२०२३ - PVTG, दि.२८ फ़ेब्रुवारी, २०२४
४. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.आविवि-२०२३/प्र.क्र.१४४/का.१९, दि.१५ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

देशातील आदिम जमातींच्या सर्वांगिण विकासाकरिता मा. प्रधानमंत्री महोदय यांच्या हस्ते दि.१५ नोव्हेंबर, २०२३ रोजी प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (PM JANMAN) या योजनेचे कार्यान्वयन करण्यात आले आहे. याकरिता केंद्र शासनाने वाचा क्र.१ येथील पत्रान्वये मार्गदर्शक सुचना निर्गमित केल्या आहेत. योजनेंमध्ये जीवनमान उंचावण्यासाठी अत्यावश्यक असलेल्या ११ प्राधान्य क्षेत्रांचा, संबंधित ९ मंत्रालयीन विभागाद्वारे समावेश करून, आदिम समाजाच्या सर्वांगीण विकासाचे ध्येय ठेवण्यात आले आहे. केंद्र शासनाने जाहीर केलेल्या ११ प्राधान्य क्षेत्रामधील बहुउद्देशीय केंद्र व वन धन विकास केंद्र ह्या घटकांची अंमलबजावणी प्रत्यक्ष आदिवासी विकास विभागाकडून करण्यात येत आहे, तर इतर घटकांची अंमलबजावणी

संबंधित विभागांकडून करण्यात येत आहे. संदर्भ २ व ३ येथील पत्रान्वये केंद्र शासनाने अनुक्रमे ५९ व ६१ असे एकुण १२० बहुउद्देशिय केंद्रांच्या उभारणीस मान्यता प्रदान केली आहे. वाचा क्र.४ येथील शासन निर्णयान्वये केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला रु.१२४७.४ लक्ष निधी अंमलबजावणी यंत्रणेस वितरित करण्यात आला आहे. आता, केंद्र शासनाकडून बहुउद्देशीय केंद्रांच्या अंमलबजावणीसाठी आणखी रु.५००.०० लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर निधी अंमलबजावणी यंत्रणेला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (PM JANMAN) या केंद्र पुरस्कृत योजनेंमधील बहुउद्देशीय केंद्र या घटकाच्या अंमलबजावणीकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला रु.५००.०० लक्ष (रु. पाच कोटी फ़क्त ) इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा राज्य समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency-SNA) म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास राज्य शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त रु.५००.०० लक्ष निधी मागणी क्र. टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण, ०२-अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (७७) प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (पीएम जनमन) (१०० % केंद्र हिस्सा), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२२५ एफ८४४) यामधील सन २०२४-२५ मध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून वितरीत करण्यात येत आहे.

३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी वितरीत निधीच्या मर्यादेत निधी तातडीने आहरीत करुन केंद्र शासनाच्या सुचनांप्रमाणे SNA बँक खात्यावर जमा करण्याची दक्षता घ्यावी .

४. आयुक्त, आदिवासी विकास नाशिक यांनी मंजुर बहुउद्देशिय प्रकल्पांच्या कामांचा वेळोवेळी आढावा घेऊन कामांच्या प्रगतीनुसार शासनाकडे निधीची मागणी करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या [www.maharashtra.gov.in](http://www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१०१६३८२१४५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CE18732734BA0742D7712775E8F0AD400558E8748375399762FD447C3E9AC1EB, cn=SATISH VITHALRAO KOVE
Date: 2025.03.10 16:39:12 +05'30'

**( सतिश कोवे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत माहिती तथा कार्यवाहीस्तव-

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. मा.मंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
९. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.
११. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
१३. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४. मा.सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५. मा. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, वित्त विभाग, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१७. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१८. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१९. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक
२१. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त विकास महामंडळ, नाशिक.

२२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर/ नाशिक/ ठाणे / अमरावती.
२३. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम कक्ष, (आदिवासी विकास विभाग), मुंबई
२७. सर्व उप सचिव/अवर सचिव आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८. निवडनस्ती (का-१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.